**मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवरील ६९ अस्थायी पदे सन २०२२-२०२३ मध्ये पुढे चालू ठेवण्याबाबत...**

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

**शासन निर्णय क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२२/प्र.क्र.६१/फ-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: १७ मार्च, २०२२

<u>वाचावे :-</u>

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक १३.०९.२०१९.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दिनांक २१.०९.२०२१.
३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.२१/प्र.क्र.६५/फ-१ दिनांक २२.०५.२०२१.
४. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्युएलपी ०३.२१/प्र.क्र.६५/फ-१ दिनांक २०.०९.२०२१.
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्रमांक : कक्ष-३/योजनेतर/ प्र.क्र. ०१(२१-२२)/२७७, दिनांक १४.०२.२०२२.
६. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क, दिनांक २२.०२.२०२२.

<u>प्रस्तावना:-</u>

मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या केलेल्या ६९ अस्थायी पदांना सन २०२१-२०२२ मध्ये संदर्भ क्रमांक ३ व ४ च्या शासन निर्णयान्वये दिनांक ०१.०३.२०२१ ते दिनांक २८.०२.२०२२ पर्यत चालू ठेवण्यासाठी शासनाची मंजुरी प्रदान करण्यात आली आहे.

२. आता संदर्भ क्रमांक ५ च्या पत्रान्वये प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या ६९ पदांना सन २०२२-२०२३ मध्ये दिनांक ०१.०३.२०२२ ते २८.०२.२०२३ पर्यंत चालू ठेवण्याबाबत प्रस्ताव शासन मान्यतेसाठी सादर केला आहे.

३. विभागाच्या आकृतिबंधातील समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक ६ च्या वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवरील (सोबत जोडलेल्या सहपत्रात नमुद) ६९ अस्थायी पदांना सन २०२२-२०२३ मध्ये दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. मुख्य वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात आलेल्या ६९ अस्थायी पदांच्या आस्थापनेवर होणारा खर्च "२४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेतर), ०१ वनीकरण, ८०० इतर खर्च, (०१) इतर खर्च, (०१) (०२) वन उपवने (२४०६०६५९)" या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२०२३ या आर्थिक वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक: असंक - १००४ / प्र.क्र.१२ /(भाग-२) /२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ०४.१०.२००४ व वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक : पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २२.०२.२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३१७१४४३२६०७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SIDDESH TUKARAM SAWARDEKAR

Digitally signed by SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7dc40890d791d1b1e6bae88da52eabb63f1f3ab6258c7e318f8c37f3ae7c36f2, serialNumber=5712ce2d7a095c22e97ebb8f03c668b12eba1db0dd8e284883b7bd7fa74da65d, cn=SIDDESH TUKARAM SAWARDEKAR
Date: 2022.03.17 14:44:40 +05'30'

**(सिध्देश सावर्डेकर)**
**विशेष कार्य अधिकारी**
**महसूल व वन विभाग.**

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम, मुंबई.
५. वनसंरक्षक व संचालक, संजय गांधी राष्ट्रीय उद्यान, बोरीवली, मुंबई.
६. महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
७. फ-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ (निवड नस्ती ).

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक : डब्ल्यूएलपी-०३.२२/प्र.क्र.६१/फ-१,**
**दिनांक: १७ मार्च, २०२२ सोबतचे विवरणपत्र**
**(दिनांक ०१.०३.२०२२ ते दिनांक ३१.०८.२०२२ या कालावधीसाठी मुदतवाढ दिलेली पदे)**

| अ.क्र. | पदनाम | पदनाम |
|---|---|---|
| १ | मुख्य वनसंरक्षक व संचालक | १ |
| २ | सहायक वनसंरक्षक | १ |
| ३ | अधीक्षक सिंहविहार (वनक्षेत्रपाल) | १ |
| ४ | कार्यालय अधीक्षक | १ |
| ५ | वनक्षेत्र सर्व्हेक्षक | १ |
| ६ | वनपाल व मुख्य प्राणी रक्षक | ९ |
| ७ | वाहन चालक | २ |
| ८ | वनरक्षक | ३२ |
| ९ | लिपिक | ६ |
| १० | चौकीदार | ३ |
| ११ | गँगमन | १ |
| १२ | क्लिनर | १ |
| १३ | वॉचमन | ६ |
| १४ | नाईक | १ |
| १५ | शिपाई | ३ |
| | **एकूण अस्थायी पदे** | **६९** |

*****